**राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान या केंद्र पुरस्कृत योंजनेंतर्गत ग्राम बिजोत्पादन कार्यक्रम सन २०२१-२२ मध्ये राबविण्याकरीता अनुसुचित जमाती संवर्गाकरीता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३२१/ प्र.क्र.१३५/१-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०००३२

दिनांक : २५ नोव्हेंबर, २०२१

वाचा : १) केंद्र शासनाचे अनुदान पुनर्जिवित बाबत पत्र १०-२/२०१८-SD.VI Dt.११.६.२०१९

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. १०-११/२०२०/SD-VI Dt.१४.०८.२०२०

३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. गुनि १/२ एसएमएसपी २१-२२/२८९६८/२०२१, दि.०३.०९.२०२१

४) संचालक कृषि (नि व गु.नि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, यांचे पत्र क्र. QC १/२/Seed/ SMSP २१-२२/१४४४७/२०-२१, दिनांक २६.०४.२०२१

५) महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, अकोला (महाबीज) यांचे पत्र क्र..महाबीज/विपणन/ २०२१/५७७, दि.१९.०७.२०२१

६) ) महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, अकोला (महाबीज) यांचे पत्र क्र..महाबीज/विपणन/ २०२१/५७८, दि.१९.०७.२०२१

७) केंद्र शासनाचे अनुदानबाबत पत्र क्र.१०-११/२०२० SD-VI Dt.२०.०५.२०२१.

८) वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१

९) ) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी २०२१/प्र.क्र.०७/कार्यासन-६,दि.११.११.२०२१

**प्रस्तावना -:**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभ्यिांनातर्गत बियाणे व लागवड साहित्यावरील उपअभियान या योजनेकरीता केंद्र हिश्श्याचा निधी महाबीजकडे परस्पर जमा होत असल्याने सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील अखर्चित व केंद्राने पुनर्जिवित करुन दिलेला रु.१७०.२८ लाख निधी राज्य शासनाकडे उपलब्ध आहे. त्यास समरुप राज्य हिस्सा रु.११३.५० लाख व सन २०१९-२० मधील अप्राप्त निधी रु.३८.६१ लाख असा एकूण रु.१५२.१३ लाख इतका निधी सन २०२१-२२ च्या आर्थिक तरतुदींतून वितरीत करण्याबाबतच्या विभागाच्या प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २४०१ कृषि उन्नती योजना- बियाणे व लागवड साहित्यावरील उप अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१ ए ६३७), ३३- अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० मधील प्रलंबित निधीसाठी वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून राज्य हिश्श्यासाठी रु.१४२.१३ लाख इतका निधी वितरीत करण्यास आदिवासी विकास विभागाने दिनांक ११.११.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. तसेच उपरोक्त प्रमाणे एकूण रु.१४२.१३ लाख ( अक्षरी रुपये एक कोटी बेचाळीस लाख तेरा हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख

म्हणून सचिव, कृषि विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधी राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत (NMAET) बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (SMSP) या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत ग्रामबिजोत्पादन योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्यासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता राज्य हिस्सा रु.१४२.१३ लाख इतका निधी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत बियाणे व लागवड साहित्य उपअभियांन (SMSP) ही केंद्र पुरस्कृत योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्यासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २४०१ कृषि उन्नती योजना- बियाणे व लागवड साहित्यावरील उप अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०१ ए ६३७), ३३- अर्थसहाय्य या लेखाशिर्षा अतंर्गत केंद्र हिश्श्यास अनुसरुन राज्य हिस्सा रु.१४२.१३ लाख इतका निधी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना खालील अटी व शर्तींचे पालन करण्याच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यांमधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१ व शासन निर्णय क्र.अर्थसं २०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ व दिनांक १४.१०.२०२१ मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी. तसेच सदर शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

२) सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ.माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर सनियंत्रण ठेवता येईल.

४) आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात मात्र फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.८ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि अनौपचारिक संदर्भ क्र.९११/व्यय-१४, दिनांक ११.१०.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२१११२५१७३९२७९१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2021.11.25 17:44:01 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
८. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. अवर सचिव (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन अधिकारी (कार्या-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रलाय, मुंबई.
११.निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.